कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या पदावरुन अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावर पदोन्नती / पदस्थापना

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः पीओजी-१२१७/ प्र.क्र. १६६ (६) / सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ०२ जुलै, २०१८

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गात कार्यरत श्रीमती सुषमा सुरेश साखरवाडे (बोंद्रे) यांना, अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या संवर्गासाठी दिनांक ९.६.१९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार, अधीक्षक अभियंता (स्थापत्य) या पदावर पी.बी.-३ वेतन बँड रूपये १५६००-३९१०० ग्रेड वेतन ७६००/- या वेतनसंरचनेत निवडसूचीच्या क्रमानुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात सेवाज्येष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गातील रिक्त पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नतीउपरांत अधीक्षक अभियंता (स्थापत्य) म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे. तसेच कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, नागपूर या पदावर अन्य अधिकाऱ्याची पदस्थापना स्वतंत्रपणे करण्यात येईल.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | कार्यरत असलेले ठिकाण | पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती सुषमा सुरेश साखरवाडे (बोंद्रे) (खुला) | कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, नागपूर | अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, चंद्रपूर | रिक्त पदी |

२. श्रीमती साखरवाडे, कार्यकारी अभियंता यांची सदर पदोन्नती, पुढे नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून करण्यात येत आहे :

i. वरील पदोन्नती मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे राज्य शासनाने दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.
ii. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने सदर पदोन्नतीच्या परिणामी त्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क राहणार नाही.

३. श्रीमती साखरवाडे यांना देण्यात आलेली सदर पदोन्नती कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

४. संबधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्रीमती साखरवाडे यांना पदोन्नतीउपरांत पदस्थापनेच्या ठिकाणी रूजू होता यावे म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करून पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे. तसेच, श्रीमती साखरवाडे यांस पदोन्नतीउपरांत पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

५.        श्रीमती साखरवाडे यांनी कमीत कमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. श्रीमती साखरवाडे यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास त्या शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

६.        सदर पदोन्नतीउपरांत श्रीमती साखरवाडे यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी एक महिन्याच्या आत कार्यभार न स्वीकारल्यास, त्यांना पदोन्नतीमध्ये स्वारस्य नाही असे समजण्यात येईल. तसेच यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १२.९.२०१६ च्या शासन निर्णयामधील तरतूदी लागू होतील.

७.        श्रीमती साखरवाडे यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा.  असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात यावी.

८.        श्रीमती साखरवाडे यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होताच पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७०२१६३९४३६९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mridula Sanjeev Deshpande

Digitally signed by Mridula Sanjeev Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b989f11a955bd12836202040b21122502b1ac600cf24865b3b7d7169e14596c4, cn=Mridula Sanjeev Deshpande
Date: 2018.07.02 16:40:26 +05'30'

**( मृ.सं.देशपांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर/विशेष प्रकल्प, मुंबई /राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
३. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
४. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
६. श्रीमती सुषमा सुरेश साखरवाडे (बोंद्रे), कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, नागपूर,
७. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
८. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
१०. जिल्हा कोषागार अधिकारी,  नागपूर / चंद्रपूर,
११. सामान्य प्रशासन विभाग, का.-१३/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,

१२. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१४. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१५. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१६. प्रधान सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१७. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१८. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. कार्यासन आस्था-१, आस्था- ३, सेवा-६, संगणक कक्ष, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०. निवडनस्ती.